ठाणे ते बोरीवली दरम्यान वाहतुकीच्या दळणवळणासाठी दुहेरी भुयारी मार्गाचे बांधकाम प्रकल्पास राज्य शासनाचे बिनव्याजी दुय्यम कर्ज वितरीत करणे व सदर कर्जाच्या मुद्दलाची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून वसूली करणे याकरिता नविन लेखाशिर्षे उघडण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२४/प्र.क्र.२२३/नवि-७
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २५ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना:-**

ठाणे ते बोरीवली दरम्यान वाहतुकीच्या दळणवळणासाठी भुयारी मार्गाचे बांधकाम या प्रकल्पासाठी राज्य शासनाचे रू. २४१७.०० कोटी रकमेचे बिनव्याजी दुय्यम कर्ज सहाय्य मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला उपलब्ध करुन देण्यास व इतर प्रकल्प अनुषंगिक मान्यता शासन निर्णय क्र. एमआरडी-३३२४/प्र.क्र. १०१/नवि-७ दि. १४ ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या मंजूर वित्तीय आराखड्यानुसार प्रकल्पावरील केंद्रीय कराच्या ५० टक्के रक्कम रु. ५७२.३० कोटी, राज्य स्तरीय करांसाठी रु. ११४४.६० कोटी आणि खाजगी व शासकीय जमीन कायमस्वरुपी व तात्पुरत्या स्वरुपातील जागा उपलब्ध करुन देण्याबाबतचा खर्चाची तरतूद रु. ७००.०० कोटी असे एकूण रु. २४१७.०० कोटी इतके बिनव्याजी दुय्यम कर्ज सहाय्य राज्य शासनाकडून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला उपलब्ध करून द्यावयाचे आहे. सदरचे दुय्यम कर्ज निधी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला वितरीत करण्यासाठी तसेच सदर दुय्यम कर्जाच्या मुद्दलाची प्राधिकरणाकडून राज्य शासनाला परतफेड करण्यासाठी नवीन लेखाशीर्षे उघडण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

ठाणे ते बोरीवली दरम्यान वाहतुकीच्या दळणवळणासाठी दुहेरी भुयारी मार्गाचे बांधकाम या प्रकल्पासाठी राज्य शासनाचे बिनव्याजी दुय्यम कर्ज वितरीत करणे व सदर कर्जाच्या मुद्दलाची प्राधिकरणाकडून वसूली करणे याकरिता पुढीलप्रमाणे नवीन लेखाशिर्षे उघडण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.:-

| **अ) खर्चाचे लेखाशिर्षे - ठाणे ते बोरीवली दरम्यान वाहतुकीच्या दळणवळणासाठी भुयारी मार्गाचे बांधकाम या प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज वितरित करण्यासाठी.** | |
|---|---|
| **Demand F-7** | **मागणी क्र. एफ-७** |
| 6217, Loans For Urban Development | ६२१७, नगर विकासासाठी कर्जे |
| 01 State Capital Development | ०१, राज्य भांडवली विकास |
| 190, Loans to Public Sector and other Undertakings | १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे |
| (00) (17) Sub-ordinate debt to Mumbai Metropolitan Region Development Authority (MMRDA) for Thane-Borivali twin tunnel project.<br>(State) (Scheme)<br>55-Loans and Advances<br>CRC (62171167) | (००)(१७) ठाणे ते बोरीवली दरम्यान वाहतुकीच्या दळणवळणासाठी भुयारी मार्गाचे बांधकाम या प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज (राज्य) (कार्यक्रम)<br>५५- कर्जे व आगाऊ रकमा<br>संकेतांक (६२१७११६७) |
| **ब) जमेचे लेखाशीर्ष- ठाणे ते बोरीवली दरम्यान वाहतुकीच्या दळणवळणासाठी भुयारी मार्गाचे बांधकाम या प्रकल्पासाठी घेतलेल्या दुय्यम कर्जाच्या मुद्दलाची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून वसुली करण्यासाठी** | |
| **Demand F-7** | **मागणी क्र. एफ-७** |
| 6217, Loans For Urban Development | ६२१७, नगर विकासासाठी कर्जे |
| 01 State Capital Development | ०१, राज्य भांडवली विकास |
| 190, Loans to Public Sector and other Undertakings | १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे |
| (00)(14) Recovery of principal against Sub-ordinate debt given to Mumbai Metropolitan Region Development Authority (MMRDA) for Thane-Borivali twin tunnel project.<br>CRC (62175289) | (००)(१४) ठाणे ते बोरीवली दरम्यान वाहतुकीच्या दळणवळणासाठी भुयारी मार्गाचे बांधकाम या प्रकल्पासाठी घेतलेल्या दुय्यम कर्जाच्या अनुषंगाने मुद्दलाची वसुली<br>संकेतांक (६२१७५२८९) |

**०२.** उपरोक्त नमूद नवीन लेखाशिर्षे २०२५-२६ या आर्थिक वर्षापासून अंमलात येतील.

**०३.** सदरचा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने तसेच महालेखाकार कार्यालयाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सं.ख.वि./चा-१ नगर विकास विभाग/यूओआर-३०५/२०२४-२५/२३०९, दिनांक २७/०२/२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२५१७२१०६२५२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI
CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.04.25 17:21:39 +05'30'

**(विजय चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखाकार, महाराष्ट्र-२, नागपूर.
३. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
९. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
१०.कक्ष अधिकारी, व्यय-३/अर्थसंकल्प-१६/ऋण व हमी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.कक्ष अधिकारी, नवि-४/५/३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.लेखा अधिकारी (नवि-३१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती, नवि-७.